**इंदापूर तालुक्यातील प्रजिमा-८४ ते रा.म.मा. क्र. ९ ते डाळज नं २ इजिमा २०५ ची प्र.जि.मा. म्हणुन दर्जोन्नती करून प्रजिमा-१२४ मध्ये अंतर्भूत करणे व प्रजिमा-१२४ मधील डाळज नं.२, डाळज नं.३ ते रा.म.मा.क्र. ९ रस्ता दर्जावनत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१६/प्र.क्र.५१/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- २२ डिसेंबर,२०१६.**

**<u>पहावे</u>** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र.जा क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/१४४/३७१७/२०१६, दिनांक १२ जुलै, २०१६.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र. जा क्र.मुअ(पुणे)/का-२/रेशा/१४४/५१३४/२०१६, दिनांक ७ सप्टेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील इंदापूर तालुक्यातील प्रजिमा-८४ तालुका हद्द पिंपळे, पोंदवाडी ते रा.म.मा.क्र.९ धुमाळवाडी, कुंभारगाव ते डाळज नं २ रस्ता इजिमा २०५ हा रस्ता प्र.जि.मा. म्हणुन दर्जोन्नत करून प्रजिमा -१२४ मध्ये अंतर्भूत करणे तसेच मूळ प्रजिमा-१२४ ची डाळज नं. २, डाळज नं.३ ते रा.म.मा.क्र. ९ ही ३.१० कि.मी. लांबी इजिमा म्हणून दर्जावनत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदर रस्त्याचा प्रवासी बस वाहतूक, दूध वाहतूक,शेतीमाल वाहतूक यासाठी फार उपयोग होतो. तसेच या रस्त्यावर उजनी धरणाच्या बॅक वॅाटरमुळे निर्माण झालेली कुंभारगांव व भादलवाडी ही फ्लेमिंगो पक्षी निरीक्षणाची महत्त्वाची पर्यटन क्षेत्रे आहेत. यामुळे आर्थिकदृष्ट्याही या रस्त्याचे महत्व आहे. या रस्त्यावर भादलगांव, डाळज क्र.२, पोंदवाडी, शेटफळ ही गावे असून, इतर गावे सुध्दा या रस्त्याला इजिमा व ग्रामा रस्त्याने जोडली आहेत.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, उजनी धरणाच्या बॅक वॅाटरमुळे निर्माण झालेली कुंभारगांव व भादलवाडी ही फ्लेमिंगो पक्षी निरीक्षणाची महत्त्वाची पर्यटन क्षेत्रे व रस्त्याचा एकुण होणारा वापर विचारात घेता इंदापूर तालुक्यातील प्रजिमा-८४ तालुका हद्द पिंपळ, पोंदवाडी ते रा.म.मा. क्र.९ धुमाळवाडी, कुंभारगाव ते डाळज नं २ रा.म.मा.क्र.९ रस्ता इजिमा २०५ ची प्र.जि.मा.म्हणुन दर्जोन्नत करून प्रजिमा-१२४ मध्ये अंतर्भूत करण्याचा तसेच मूळ प्रजिमा-१२४ ची डाळज नं. २ , डाळज नं.३ ते रा.म.मा.क्र. ९ ही ३.१० कि.मी. लांबी इजिमा म्हणून दर्जावनत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे चा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील इंदापूर तालुक्यातील प्रजिमा ८४ तालुका हद्द पिंपळे, पोंदवाडी ते रा..ममा.क्र. ९ धुमाळवाडी, कुंभारगाव ते डाळज नं.२ रस्ता इजिमा २०५ ची प्र.जि.मा. म्हणून दर्जोन्नती करून प्र.जि.मा. १२४ मध्ये अंर्तभूत तसेच मूळ प्रजिमा-१२४ ची डाळज नं.२, डाळज नं.३ ते रा.म.मा.क्र. ९ ही ३.१० कि.मी. लांबी इजिमा म्हणून दर्जावनत करण्यात येत आहे. परिणामी पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीमध्ये १३.८० कि..मी इतकी वाढ होईल तसेच प्रजिमा-१२४ रस्त्याची ३.१० कि.मी. लांबी साखळी क्रमांक २६/१४० ते २९/२४० इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जावनती केल्याने ३.१० कि.मी. ने घट होईल. परिणामी एकुण लांबी ( ४१३३.५४ + १०.७०) म्हणजे ४१४४.२४ कि. मी. इतकी होईल व इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्याच्या लांबीत १०.७० कि. मी. ने घट होऊन एकूण लांबी (२४००.४४ -१०.७०) म्हणजे २३८९.७४ कि. मी. इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१२४५०८५४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2016.12.22 12:52:13 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, पुणे.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सा.बां.(पूर्व) सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, पुणे.
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.